**महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर यांचेद्वारे कोलवॉशरीजच्या अनुषंगाने राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेची चौकशी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. लवेसू-०३२०/प्र.क्र.०९/उद्योग-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १३ मार्च, २०२०

**<u>वाचा:</u>** शासन पत्र क्र.लवेसू-०३२०/प्र.क्र.०९/उद्योग-९, दि.०४.०३.२०२०

महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या. नागपूर यांना महाजेनकोच्या औष्णिक विदयुत प्रकल्पांना चांगल्या प्रतीचा कोळसा प्राप्त होणेकरिता राज्यातील कोळसा खाणीतील कोळसा वॉशरीज द्वारे दर्जोन्नती करण्यासाठी समन्वय यंत्रणा नियुक्त केली आहे. सदर कोळसा वॉशरीजच्या अभिकर्ता नियुक्तीसाठी महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळाद्वारे निविदा प्रक्रिया अवलंबविण्यात आली होती. तथापि, सदर निविदा प्रक्रियेसंदर्भात सर्वश्री धर्मरावबाब आत्राम, सुभाष धोटे, श्रीमती प्रतिभा धानोरकर, श्री.विकास ठाकरे, श्रीमती सुलभा खोडके, सर्वश्री अमिन पटेल, कुणाल पाटील मा.विधानसभा सदस्य यांनी महाराष्ट्र विधानसभा नियम-१०५ अन्वये लक्षवेधी सूचना उपस्थित केली होती. सदर लक्षवेधी सूचनेच्या अनुषंगाने दि.३ मार्च २०२० रोजी विधानसभा सभागृहात झालेल्या चर्चेदरम्यान मा.मंत्री (उदयोग व खनिकर्म) यांनी सदर निविदा प्रक्रियेस स्थगिती देण्याची घोषणा केली व सदर निविदा प्रक्रियेची प्रधान सचिव (उदयोग व खनिकर्म) यांचे अध्यक्षतेखालील समिती मार्फत एक महिन्यात चौकशी करण्याबाबत सभागृहास आश्वासन दिले आहे.

**<u>शासन निर्णय:</u>**

मा.मंत्री (उद्योग व खनिकर्म) यांनी दिनांक दि.०३ मार्च २०२० रोजी सभागृहात दिलेल्या आश्वासनाच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळाच्या निविदाप्रक्रियेची चौकशी करण्याकरिता नियुक्ती समितीची **<u>रचना</u>** खालील प्रमाणे:-.

| | |
|---|---|
| १. प्रधान सचिव, (उद्योग व खनिकर्म) | - अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव (ऊर्जा विभाग) | - सदस्य |
| ३. व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य विदयुत निर्मिती कंपनी मर्या. | - सदस्य |
| ४. उप सचिव (खनिकर्म), उदयोग विभाग | -सदस्य सचिव |

२. **<u>व्याप्ती व कार्यकक्षा :-</u>**

अ) महाजेनकोकडुन महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळाला कोलवॉशरीजकरिता नोडल एजन्सी नियुक्त करण्याबाबतचे औचित्य तपासणे.

आ) सदर निविदेसंदर्भात विहित मार्गदर्शक तत्त्वाप्रमाणे कोलवॉशरीजची निविदाप्रक्रिया झाली किंवा कसे याबाबत तपासणी करणे.

इ) सदर निविदा प्रक्रियेद्वारे प्राप्त कोलवॉशरीजचे न्युनतम दर वाजवी आहेत किंवा कसे, याबाबत तपासणी करणे.

ई) सन्माननीय सदस्यांनी उपप्रश्न विचारताना उपस्थित केलेल्या अन्य मुद्यांची माहिती घेऊन ते तपासणे.

**३.** सदर शासन निर्णय निर्गमित झालेल्या दिनांकापासून एक महिन्यात समिती शासनास अहवाल सादर करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३१४५५१८१६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
Date: 2020.03.13 15:01:06 +05'30'

**( सगुना काळे-ठेंगील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-** १. मा. मंत्री (उद्योग/ खनिकर्म), यांचे स्वीय सहायक.
२. मा. राज्यमंत्री (उद्योग/ खनिकर्म), यांचे स्वीय सहायक.
३. प्रधान सचिव (उद्योग/ खनिकर्म) यांचे स्वीय सहायक.
४. प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक.
५. व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य विदयुत निर्मिती कंपनी मर्या.
६. व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या.नागपूर
७. उप सचिव (खनिकर्म)
८. प्रधान लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई व नागपूर
९. निवडनस्ती (उद्योग-९).